**कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत मंजुर ९४०५ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ या कालावधी पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०२१/१२३/प्र.क्र.६९/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: ०४ ऑक्टोंबर, २०२१

वाचा -

1) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी -२०२१/१२३/ प्र.क्र.६९/कुक, दिनांक : २३.०३.२०२१**
2) **संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे यांचे पत्र क्रमांकः संआसे/ आस्था/ मुदतवाढ/ ९४०५पदे/ कक्ष-२क/ न.क्र.५६/५३८२१/२०२१, दि.१८.०८.२०२१**
3) **वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.१०.०८.२०२१**

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांतर्गत कार्यरत असलेल्या ९४३५ अस्थायी पदांना संदर्भ क्र. १ अन्वये दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. विभागीय कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत मंजूर असलेल्या ९४३५ अस्थायी पदांपैकी सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. १८२/आरोग्य-३अ, दि. १० मार्च, २०२१ अन्वये नागरी कुटुंब कल्याण केंद्र, राज्य कामगार विमा योजना, वरळी, अंधेरी, कांदीवली, मुलुंड, परेल ही केंद्रे बंद केलेली असल्याने त्यांच्या कार्यालयातील प्रत्येकी ६ अशी एकूण ३० पदे वगळून एकूण ९४०५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे यांनी संदर्भ क्र.२ अन्वये शासनास सादर केला आहे. अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्राधिकार दिले आहेत. त्यानुसार वरील अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासन स्तरावर विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीकरीता मंजूर असलेल्या ९४०५ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या दि.१०.०८.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२१ ते २८.०२.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. १८२/आरोग्य-३अ, दि. १० मार्च, २०२१ अन्वये नागरी कुटुंब कल्याण केंद्र, राज्य कामगार विमा योजना, वरळी, अंधेरी, कांदीवली, मुलुंड, परेल ही केंद्रे बंद केलेली असल्याने त्यांच्या कार्यालयातील प्रत्येकी ६ अशी एकूण ३० पदे वगळून एकूण ९४०५ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरीता सदर अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च विभागाच्या अर्थसंकल्पात २२११-कुटुंब कल्याण या मुख्य लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत मंजूर असलेल्या अस्थायी पदांचा लेखाशिर्षनिहाय तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ.क्र. | योजनेचे नांव | एकुण मंजूर अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | राज्य कुटुंब कल्याण केंद्र | ४५ |
| २ | जिल्हा कुटुंब कल्याण केंद्र | ११९ |
| ३ | आरोग्य व कुटुंब कल्याण केंद्र | २५ |
| ४ | बहुद्देशिय आरोग्य कर्मचारी योजना | ५० |
| ५ | वैद्यकीय महाविद्यालयातून प्रशिक्षण | ०३ |
| ६ | ए.एन.एम.प्रशिक्षण संस्था | २७९ |
| ७ | सामान्य रुग्णालय, भंडारा | २० |
| ८ | सामान्य रुग्णालय, रत्नागिरी व डागा मेमोरिअल हॉस्पिटल, नागपूर | ०२ |
| ९ | ग्रामीण कुटुंब कल्याण केंद्र | ८६८८ |
| १० | शासकीय नागरी कुटुंब कल्याण केंद्र | १३९ |
| ११ | सार्वजनिक आरोग्य शुश्रुषा विद्यालय परिचर्या शाळा, नागपूर | ०९ |
| १२ | सामान्य रुग्णालय कोल्हापूर | २६ |
| | एकूण | ९४०५ |

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०/०८/२०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२११००४१५१९३५५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nilesh Madhukar Falke

Digitally signed by Nilesh Madhukar Falke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9b937361525edcb194dec2d7985fb077e5abd6b9fad45b976539bce4d36b0b69, cn=Nilesh Madhukar Falke
Date: 2021.10.04 17:43:49 +05'30'

**( निलेश फाळके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई
३. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे (५ प्रती)
६. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
७. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
८. सचिव, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, केंद्र शासन, निर्माण भवन, नवी दिल्ली .
९. विभागीय संचालक, कुक, ८५/२, पर्वती पहिला माळा, दर्पण बिडींग सहकार नगर, पुणे.
१०.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
११.सह संचालक (अर्थ व प्रशासन ) आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
१२.उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
१३.उप संचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
१४. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
१५. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. वैद्यकीय अधिकारी, केंद्रीय रुग्णालय, उल्हासनगर,जिल्हा ठाणे

१७. प्राचार्य, नागपूर कॉलेज ऑफ होमिओपूथी व बायोकेमिस्ट्री, ५४३, आरमशाळा, लेआऊट, ग्रेट नाग रोड, नागपूर ४४० ००९.

१८. वैद्यकीय अधिक्षक, सामान्य आरोग्य, शुश्रुषा विद्यालय परिचर्या शाळा, नागपूर

१९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

२०. वित्त विभाग (व्यय-१३) मंत्रालय, मुंबई

२१.नियोजन विभाग (का-१४१२) मंत्रालय, मुंबई., मुंबई

२२.सार्वजनिक आरोग्य विभाग (आस्थापना) मंत्रालय, मुंबई.

२३.निवडनस्ती /कु.क.